# शिक्षकास थोडासा बोध.



विनायक कोंडदेव ओक.

जो कोणी ज्ञान बोधी समूळ अविद्या छेदी
इंद्रियदमन प्रतिपादी तोचि सद्गुरु जाणावा.

रामदास.

मुंबई येथें.
"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

शके १८१२–सन १८९०.

हें पुस्तक

रावबहादुर गोविंदराव रामचंद्र गरुड,

खानदेशाचे प्रमुख,

ह्यांस

त्यांची थोरवी, परोपकारबुद्धि, सज्जनता, आणि

विद्यावृद्धीविषयीं परम दक्षता ह्या

गुणांच्या अभिनंदनार्थ

अत्यादरपूर्वक

अर्पण केलें आहे.

# सूचना.

इ० स० १८९० च्या आगष्ट महिन्याच्या चवथ्या तारखेस पुणें येथील मराठी शाळांतले शिक्षक आणि ट्रेनिंग स्कुलांतले विद्यार्थी त्यांस हा बोध रा. रा. विनायक कोंडदेव ओक त्यांनीं केला. तो सर्व शिक्षकांस उपयोगीं पडण्यासारखा आहे असा वाटल्यावरून छापला आहे.

# शिक्षकांस थोडासा बोध.

जें कांहीं आपणासि ठावें तें हळू हळू शिकवावें
शाहाणे करून सोडावे इतर जन.

**रामदास.**

गुरुविणें न घडे परमा गती
गति शुकादि गुरूसचि मागती.

**वामन.**

गुरुकुळवास तुला स्मरतो कीं जेणें तरतो मूढ
सहजचि होतो अक्षय सुखदस्वात्मपदीं आरूढ.

**मोरोपंत.**

**मित्रहो,**

रामदासस्वामींची एक गोष्ट अशी सांगतात कीं, कोणे एके प्रसंगीं ते सहज एका शेतकऱ्याच्या शेतांत गेले, इतक्यांत तो शेतकरी तेथें आला. तेव्हां, स्वामींच्या हातून जरी त्या शेतांत कांहीं एक नासाडी झाली नव्हती, तरी, त्या शेतकऱ्यानें त्यांस पुष्कळ मारिलें. पण समर्थांस त्याचा राग आला नाहीं, एवढेंच केवळ नव्हे; तर, परवानगी न घेतां आपण दुसऱ्याच्या शेतांत गेलों, हा आपण मोठा अपराध केला, ह्याबद्दल त्या शेतकऱ्यानें आपणांस यथायोग्य शासन केलें, असें त्यांस वाटलें, आणि त्यांनीं त्यास गुरु समजून, शिवाजीमहाराजांकडून, त्याची चांगली संभावना करविली. ह्या आख्यायिकेचें तात्पर्य एवढेंच घ्यावयाचें कीं, आपणांस जो कोणी आपली चुकी दाखवितो—आपण करायास पाहिजे काय हें शिकवितो—तो इतर प्रकरणीं कितीही अजाण असो, किंवा कितीही क्षुल्लक असो, तो

त्या उपदेशापुरता आपला गुरु आहे, असें थोर पुरुष समजतात. तसेंच मोरोपंतांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे:—

चुकल्या जनास कोणी
दावुनि निजहितपथासि जो लावी
धनदेंहि उपकृतीशीं
त्याच्या निजसंपदा न तोलावी.

आणि, विद्या शिकविणें हें कितीही लहान, किंवा कितीही स्वार्थ-दृष्टीचें असो, त्यांत परोपकार असतो. कां कीं, आपणास जेवढा लाभ होतो, तेवढ्यापुरती मात्र विद्या विद्यार्थ्यास शिकवावी, असें कोणाही शिक्षकाच्यानें करवत नाहीं. शिक्षकास झालेला लाभ आणि त्यानें दिलेली विद्या ह्यांच्या किमतीचें साम्य कधीही व्हावयाचें नाहीं. शेतांत पेरलेला एक दाणा आणि त्याच्या झाडास आलेल्या कणसाचे दाणे ह्यांत शेंकडोंपटीचें अंतर असतें. सर ऐझाक न्यूटन हा शाळेंत शिकत होता; तेव्हां, त्याच्या गुरूनें, कार्य आणि कारण ह्यांच्या संबंधाचा विचार करण्याची जी सरणी त्यास लावून दिली होती, तिच्याच धोरणानें, फळ खालीं पडल्याच्या कारणाचा विचार त्यानें केला, आणि त्यावरून गुरुत्वाकर्षणाचा नियम त्यास शोधून काढितां आला. शिवाजीमहाराजांस जे मोठमोठे गुण प्राप्त झाले होते, त्यांचें बीजारोपण त्यांच्या लहानपणच्या पुराणश्रवणांत झालें होतें. ह्यावरून सांगावयाचें मिळून एवढेंच कीं, आपलें स्वतःचें ज्ञान कितीही थोडें असो, तें शिकविण्याच्या कामाबद्दल आपणांस कितीही थोडी प्राप्ति होत असो, आणि आपल्या हाताखालचे विद्यार्थी कितीही अल्पवयस्क आणि बुद्धिमंद असोत, आपण एक प्रकारची पेरणी करितों आहों, आपण एक प्रकारचें बीजारोपण करीत आहों, ह्यास फळें, प्रत्यक्षतः किंवा परंपरया, के-

व्हां तरी येणार आहेत, आणि त्या फलांवर, पुष्कळ माणसांचें, किंबहुना सगळ्या राष्ट्राचें सुखदुःख अवलंबून राहाणार आहे, असें तुह्मीं सर्व शिक्षकांनीं निरंतर आपल्या अंतःकरणांत वागविलें पाहिजे, आणि त्याच्या अनुरोधानें आपापलें कर्तव्य केलें पाहिजे. ही जबाबदारी फार मोठी आहे. शेतांत चांगलें पीक येणें हें जसें पावसाच्या स्वाधीन आहे, तसें राष्ट्रांत चांगलीं थोर माणसें उत्पन्न होणें हें शिक्षकांच्या स्वाधीन आहे. फिलिपराजास शिकंदर हा पुत्र झाल्याबरोबर त्यानें आपला राजगुरु आरिस्टाटल ह्यास लिहिलें कीं, "परमेश्वरानें मला पुत्र दिला, हे तर त्याचे मजवर उपकार आहेतच; पण, त्यास शिकविण्यास तुमच्यासारखे ज्ञानराशि गुरु आमच्या दरबारांत असतां देवानें मला तो दिला आहे, हा त्याचा मजवर विशेष उपकार आहे." ह्यावरून सुशिक्षणाचें आणि सुशिक्षकाचें माहात्म्य केवढें आहे तें पहा.

इपिक्टिटस हा एक मोठा तत्त्वज्ञानी होऊन गेला. त्यानें शिक्षकजनांस लक्षून ह्मटलें आहे—"तुह्मी मोठमोठ्या उंच इमारती बांधल्यानें राष्ट्राचें हित व्हावयाचें नाहीं; तर राष्ट्रांतल्या लोकांचीं मनें मोठीं करा, उन्नत करा, उदार करा, ह्मणजे राष्ट्राचें हित होईल. कां कीं, इंद्रमंदिरासारख्या शोभायमान गृहांमध्यें ज्ञानशून्य आणि नीच माणसें असावीं, त्यापेक्षां लहान लहान झोंपड्यांमध्यें महात्मे असावे, हें फार इष्ट आहे." आणि हें घडवून आणणें हें पुष्कळ अंशीं तुह्मां शिक्षकमंडळीवर अवलंबून आहे. ह्मणजे, तुह्मी जर आपलें कर्तव्य, कालदेशवर्तमान पाहून आणि आपली जबाबदारी बरोबर समजून कराल, तर तुमच्या हातून तुमच्या राष्ट्राचें एक महत्कार्य होणार आहे.

आतां, तुमचें कर्तव्य तें काय, आणि तें तुह्मीं करावें कसें, ह्याविषयीं थोडें सांगायास पाहिजे. तर आधीं प्रथम तुमचें क-

र्तव्य काय तें पाहायाचें. तें तुमचें कर्तव्य एवढेंच कीं, तुमचे विद्यार्थीजन प्रौढ झाल्यावर त्यांस जे नानाप्रकारचे व्यवसाय करावे लागायाचे आहेत, त्या व्यवसायांत त्यांस यश घेण्यास आणि सुख होण्यास आवश्यक, असें जें कांहीं ज्ञान तुह्मांस प्राप्त झालेलें आहे, तें त्यांस देणें—ह्मणजे त्यांस शिकविणें. हें नुसत्या शब्दांनीं होत नाहीं. फिच ह्या नामांकित ग्रंथकारानें आपल्या पुस्तकांत असें ह्मटलें आहे कीं, "तुह्मी जें काय शिकवितां, तें नुसतें तोंडानें सांगून किंवा कांहीं गोष्टी करून शिकवितां असें नाहीं; तर, तुह्मी दुनयेंत ज्या रीतीनें राहातां आणि वागतां, त्या रीतीनें पुष्कळ शिकवितां." हें शब्दशः खरें आहे. ह्मणजे, तुमच्या तोंडच्या शब्दांवरून किंवा हातच्या कृतीवरूनच तुमचे विद्यार्थी तयार होतात असें नव्हे, तर, तुह्मी जसे खरोखर असतां, तसे तुमचे विद्यार्थी तयार होतात. ह्मणून, तुह्मी नुसते विद्वान् झाल्यानें तुह्मांस शिक्षकाचें काम उत्तम रीतीनें करतां यावयाचें नाहीं; तर विद्वान् होऊन, नीतिमान्, धर्मशील, सत्यशील, आणि व्यवहारज्ञ झालें पाहिजे; तरच तुह्मांला तुमचें कर्तव्य बरोबर रीतीनें करतां येणार आहे.

तुमच्या विद्यार्थ्यांस तुह्मांस जें काय शिकवावयाचें आहे, त्यांत अगदीं पहिली गोष्ट ह्मटली ह्मणजे आत्मसंगोपन होय. ह्या आत्मसंगोपनांत दोन पर्याय आहेत; एक देहसंगोपन आणि एक चित्तसंगोपन. देहसंगोपनामध्यें अनेक उपायांचा समावेश होतो. शरीर चालण्यास जें काय अत्यंत आवश्यक आहे—ह्मणजे अन्नपाणी, वस्त्रप्रावर्ण, घरदार इत्यादि—तें त्यांस संपादितां येईल, अशी विद्या तुह्मीं त्यांस शिकविली पाहिजे. त्याप्रमाणेंच, ज्या अपघातांनीं शरीरास अपाय होतात, ते अपाय घडण्याचीं कारणें, काल, आणि स्थलें हीं सांगून, त्यांस सावध करून ठेविलें

पाहिजे. आणि तसेंच, अन्नवस्त्रादि ज्या साधनांनीं सुख वाढवितां येतें, तीं साधनें वाढवावीं कशीं, हेंही दाखवून दिलें पाहिजे.

दुसरा पर्याय चित्तसंगोपनाचा आहे. तो देहसंगोपनापेक्षां फार अधिक महत्त्वाचा आहे. त्यांत, आत्मसंयमन, औदार्य, परोपकार, देवाची भक्ति करणें, वडिलांचा मान राखणें, शेजाऱ्यांवर ममता करणें, चांगलें काम करण्याविषयीं दृढनिश्चय करणें, आयुष्य सत्कर्मांत घालविणें, कोणत्या तरी पर्यायेंकरून आपण दुसऱ्याच्या उपयोगीं पडणें, आणि मनुष्यामध्यें जें देवत्व आहे असें तत्त्ववेत्ते ह्मणतात, तें वृद्धि पावून विशेष प्रगट होई असें करणें, ह्या सर्वांचा समावेश होतो.

हें तुमचें कर्तव्य,—ह्मणजे आत्मसंगोपन करणें आणि चित्तसंगोपन करणें,—हें विद्यार्थ्यांस शिकवावयाचें, असें थोडक्यांत, दोन शब्दांत सांगितलें. परंतु तें करायाचें फार कठिण आहे—अतिशयित कठिण आहे. तें करायास तुह्मांला आपलें आचरण असें टेविलें पाहिजे कीं, त्याचें अनुकरण तुमच्या विद्यार्थ्यांनीं केलें असतां हें दोन्ही प्रकारचें संगोपन त्यांस करितां येऊन त्याच्या योगानें तुह्मांला समाधान व्हावें. तुह्मी विद्यार्थ्यांपाशीं जी उरस्फोड करीत असतां, तिचा सगळा हेतु एवढाच असतो कीं, त्यांनीं तुह्मांसारखें व्हावें. ह्मणजे, तुह्मांला येत आहे तें त्यांना यावें आणि तुह्मी वागतां त्या रीतीनें त्यांनीं वागावें, अशी तुमची इच्छा असते. हें जर खरें आहे, तर ह्यास उपाय एक आहे. तो हा कीं, आधीं प्रथम स्वतः तुह्मी चांगले होऊन, त्यांनीं कसें व्हावें हें तुह्मीं स्वतः होऊन दाखविलें पाहिजे. मनुष्य हा मोठा अनुकरणी प्राणी आहे. त्यांत मुलांच्या ठायीं हें अनुकरणीपण फार असतें. ज्यांस आपण पूज्य आणि मोठा मानितों, त्यांसारखें आपण व्हावें, अशी इच्छा त्यांच्यामध्यें अतिशयित असते.

फार काय सांगावें, एकाद्या गुरूचे ठायीं जर एकादें बारीकसारीक व्यंग असलें, तर, तें देखील आपले ठायीं आणण्याचा प्रयत्न मुलें करितात. ह्याची प्रतीति आपणां सर्वांस प्रत्यहीं थोडीबहुत येते. आणि मला असें वाटतें कीं, मुलांचें शिक्षण चांगलें व्हावें ह्मणूनच बुद्ध्या ही योजना परमेश्वरानें करून ठेविली आहे. तर, हिचा उपयोग तुह्मी शिक्षकांनीं चांगला करावा. हिचा उपयोग, तुमच्या इतका, दुसऱ्या कोणत्याही माणसांस करितां यावयाचा नाहीं.

आणखी असें पाहा कीं, लोकहिताचीं कामें करणारे इतर लोक आणि तुह्मी शिक्षक लोक ह्यांमध्यें एक अंतर फार मोठें आहे. फौजदार, मामलेदार, मुनसफ इत्यादि कामगार लोकहिताचीं कामें करितात. त्यांचा हेतु कांहीं असा नसतो कीं, लोकांस आपणांसारखें करावें. हे कामदार इतर लोकांस फौजदार, मामलेदार, मुनसफ—न्यायाच्या कामांत प्रवीण,—बनविण्याचा उद्योग करीत नसतात. परंतु, तुह्मी जे आहांत, ते, आपल्या विद्यार्थ्यांस आपणां स्वतःसारखे बनविण्याचा प्रयत्न करीत असतां; ह्मणजे तुह्मांला येत असतें तें त्यांस येईसें करितां. आणि माणसांस दिवसेंदिवस चांगल्या स्थितीस पोंचवावयाचें—त्याचे ठायीं जें देवत्व अल्प आहे तें वाढवावयाचें—हा मनुष्याच्या सगळ्या प्रयत्नांचा हेतु असावा, हें थोर पुरुषांचें ह्मणणें जर सर्वांस मान्य आहे, तर, तो हेतु साधेल, असें वागण्याची जबाबदारी जितकी तुह्मांवर आहे, तितकी दुसऱ्या कोणावरही नाहीं. तुह्मी सांचे आहांत, आणि राष्ट्रांतली लहान विद्यार्थीमंडळी ही चिकणमाती आहे; तुह्मी जसे असाल तशा त्या मातीच्या आकृति बनावयाच्या आहेत—हें ह्मणणें स्वभावाच्या आणि वर्तनाच्या संबंधानें घ्यावयाचें, हें उघड आहे. ह्मणून केवळ स्वकल्याणाकरितांच नव्हे—केवळ निर्वाहा-

करितांच नव्हे—तर आमच्या ह्या राष्ट्राच्या हिताकरितां, कल्याणाकरितां, उन्नतीकरितां, उद्धाराकरितां तुह्मी चांगले व्हा, अशी तुह्मांस प्रार्थना आहे. पहा, सर्व लहान मुलें तुमच्या स्वाधीन आहेत, आणि त्यांचीं आईबापें ह्मणजे मोठीं माणसें, प्रेमसंबंधानें, एके प्रकारें, त्या मुलांच्या स्वाधीन आहेत; ह्मणजे पर्यायेंकरून सगळें राष्ट्र तुमच्या स्वाधीन आहे. त्यास तुह्मी जसें बनवाल तसें तें बनणार आहे. ह्मणून तुह्मी चांगले व्हा, ह्मणजे आमचें हें राष्ट्र चांगलें होईल.

आतां, तुह्मी चांगले व्हा ह्मणजे काय, हें थोडें स्पष्ट करून सांगितलें पाहिजे.

१. **स्वज्ञानवृद्धीची आस्था धरा.**—ज्ञान अपार आहे. आणि त्याचा अंश आंगीं असतो, त्या मानानें मनुष्याची योग्यता जगांत होते. ह्मणून तें वाढविण्याचा प्रयत्न निरंतर करा. इपिक्टिटस ह्याच्या ह्मणण्याप्रमाणें जर मनें मोठीं करावयाचीं आहेत, तर तीं केवळ ज्ञानदानानें होणार आहेत; आणि ज्ञानदान तुमच्या हातीं आहे. ह्मणजे आमच्या राष्ट्राचें भावी मोठेपण परमेश्वरानें तुमच्या हातीं दिलें आहे. ह्मणून तुह्मांस त्याविषयीं फार जपलें पाहिजे. आणखी सध्याच्या काळीं तें फार सुलभ झालें आहे. ज्ञानाचा प्रसार करण्याचीं साधनें पुष्कळ आहेत. परमेश्वरकृपेनें वर्तमानपत्रें आणि पुस्तकें सस्तीं होत चाललीं आहेत, तीं, गरीबीच्या रीतीनेंच, घेववतील तितकीं घ्या, आणि वाचा; आणखी वाचण्यानें आणि विचारानें जें चांगलें असें खचीत वाटेल, त्याप्रमाणें यथाशक्ति वागण्याचा प्रयत्न करा. तो इतका कीं, तो तुमच्या वर्तनामध्यें अगदीं स्पष्टपणें विद्यार्थीजनांस दिसून येऊन, तो कित्ता त्यांनीं उचलावा. आणि ग्रंथावलोकन आणि विचार करणें हें स्वोन्नतीचें मुख्य उत्तम साधन आहे, असें त्यांचे ठायीं बाणावें.

**२. सभ्यपणा धरा.**—अप्रशस्त गोष्ट आपल्या हातून कधीं घडूं नये, आणि अवाच्य शब्द आपल्या तोंडांतून कधीं निघूं नये. असा नेम ठेवा, आणि जें काय करावयाचें किंवा बोलावयाचें तें दुसऱ्यांनीं कित्ता घेण्यासारखें असावें, अशाविषयीं जपत जा. सभ्यपणा हें थोरपणाचें मुख्य लक्षण आहे. तो सभ्यपणा तुमचे वागण्यांत इतका पाहिजे कीं, विद्यार्थी कितीही गबाळ्या आणि अव्यवस्थित असला, तरी तो त्याच्या लक्षांत यावा. ह्या सभ्यपणांत सत्य भाषण, नम्रता, परहितबुद्धि, सहनशीलता, इत्यादि उत्तम गुणांचा समावेश होतो. आपल्या हरिश्चंद्र राजाची गोष्ट मनांत आणा. एवढासा लहान मुलगा जार्ज वाशिंग्टन, बापास ह्मणाला, "माझ्यानें खोटें बोलवत नाहीं." भीमसेन अति क्रोधायमान झाला तेव्हां धर्मराज ह्मणाले, "जरी क्रोध नावरे तुझिया चित्ता तरी गदा ओपींगा माझिया माथां." इंग्लंडांतला नामांकित सरदार ड्यूक आफ् वेलिंग्टन ह्यास एवढाल्या मोठ्या सैन्यांस हुकूम करण्याची संवय होती; तरी, साधारण आपल्या चाकरांशीं देखील बोलतांना त्यांस "कृपा करून, मेहेरबानी करून" असें ह्मणत असे. हें सगळें सभ्यपण आहे. हें कोठून मिळवून आणायास नको. तुमच्या अंतःकरणांत आहे. तें बाहेर काढा ह्मणजे तुमचें आणि तुमच्या विद्यार्थ्यांचें कल्याण होईल.

**३. नियमित व्हा.**—ह्मणजे आपलीं कामें वेळच्यावेळेस नेमानें करा. मग तीं कामें तुमच्या व्यवसायाच्या संबंधाचीं असोत, किंवा दुसरीं असोत. ही पद्धति फार सोईची आणि अत्यंत हितकारक आहे. आणि ह्मणूनच तिची व्याप्ति परमेश्वरानें सृष्टिक्रमांत ठेविली आहे. सूर्य, चंद्र, ग्रह, ह्यांचे उदयास्त, समुद्राची भरतीओहोटी, हीं सगळीं नेमल्या वेळीं होतात. जार्ज वाशिंग्टन ह्याच्या जाण्यायेण्याच्या वेळावरून लोक आपलीं

घड्याळें बरोबर लावीत असत. जर्मनीचा पांचवा चार्लस ह्मणत असे कीं, वेळच्या वेळीं कामें करणें हें सभ्य गृहस्थाचें मुख्य लक्षण आहे, तुह्मी वेळच्यावेळेस आपलीं कामें केलीं कीं, तुमचे विद्यार्थी आपलीं कामें वेळच्यावेळीं करतील.

**४. नम्र व्हा.**—आपण आपलें कर्तव्य कायावाचामनेंकरून, नम्रपणें, करवेल तितकें करण्याचा प्रयत्न करीत आहों, असें जनांच्या—आणि त्यांत विशेषेंकरून आपल्या विद्यार्थ्यांच्या—प्रतीतीस आणून द्या. संपत्ति आणि ज्ञान ह्यांनीं गर्व होतो, त्याचा परिणाम फार वाईट होतो, ह्मणून, तो न धरितां नम्र व्हावें, असें त्यांस इतिहासांवरून शिकवा. रावण एवढा संपत्तिमान् आणि ज्ञानवान् होता, त्याचा गर्व कोठें राहिला? सर ऐझाक न्यूटन एवढा तत्त्ववेत्ता होता, तरी तो ह्मणत असे कीं, समुद्रकांठचे वाळवंटाएवढें मोठें ज्ञान आहे, आणि त्यांतला एक कण माझ्या हातीं लागला आहे! अशीं उदाहरणें देऊन त्यांचे ठायीं नम्रता ठसवावी.

**५. श्रेष्ठांचा मान राखा.**—आपल्या वर्तनानें सज्जनांस संतोष व्हावा, हा हेतु मानांत धरून वागा. आपण दुसऱ्यास मान देणें हें मान मिळविण्याचें उत्तम साधन आहे असें समजा. इतरांची गोष्ट असो. मुलांस तुह्मी चांगल्या संभावित रीतीनें वागवा, ह्मणजे तुह्मांला मान देण्याविषयीं त्यांचे ठायीं प्रवृत्ति आपोआप उत्पन्न होईल. तीस आणखी प्रयास करण्याचें प्रयोजन नाहीं. आणि ती प्रवृत्ति तुमच्या कार्यास फार उपयोगीं पडेल. ह्मणून आह्मी असें ह्मणतों कीं, मान देणें हें मान करून घेणें आहे.

**६. आपलें कर्तव्य.**—मग तें आपल्या स्वतःच्या सं- असो, आपल्या कुटुंबाच्या संबंधाचें असो, किंवा

ह्याच्या संबंधाचें असो, मनापासून, ईश्वरास साक्ष ठेवून, काल, देश, वर्तमान पाहून, बलाबल मनांत आणून करा. ह्मणजे यश तुमच्या घरीं चालत येईल. हीं कर्तव्यें कोणतीं तें तुह्मी आपल्या विद्यार्थ्यांस चांगलें सांगा, आणि तीं करण्याचा कित्ता तुह्मी त्यांस घालून द्या. हें काम सध्याच्या काळांत फार आवश्यक झालें पाहिजे. कां कीं, त्यावांचून आमच्या राष्ट्राचें मनस्वी खोळंबलें आहे. आणि तसा चांगला कित्ता नसल्यामुळें आमच्या तरुण मंडळीच्या वर्तनाचा प्रवाह भलतीकडेस जाण्याचें भय पडलें आहे. ह्मणून, आपलीं कर्तव्यें काय आहेत, तीं चांगलीं समजून घेऊन, तीं प्रथम तुह्मी यथाशक्ति करा, आणि आपल्या कित्त्यावर आपल्या विद्यार्थ्यांस तीं करायास लावा.

७. आणखी शेवटचें सांगणें हें आहे कीं **भक्तिमान् व्हा.** ह्मणजे, आपला आत्मा, आपला देश, आणि परमेश्वर, ह्यांची भक्ति एकनिष्ठपणें करा. ह्मणजे, आत्मा आणि देश यांस सुख प्राप्त व्हावें आणि शेवटीं परमेश्वरासमोर जाण्यास आपणांस आनंद वाटावा, असे सर्व प्रकारीं वागा.

आणखी तुह्मांला एक विशेष गोष्ट सांगावयाची आहे; ती तुह्मी कृपा करून लक्षपूर्वक ऐकाल आणि कराल अशी आशा आहे. ती गोष्ट ही कीं, तुह्मीं सर्वांनीं स्त्रीशिक्षणास मदत करावी. ती मदत करण्याच्या मार्गांत अत्यंत सुलभ--गरीबगुरिबांस देखील साध्य--असा मार्ग मी तुह्मांला सांगतों. तो हाच कीं तुह्मी आपल्या बायकांस लिहिणें वाचणें शिकववेल तितकें शिकवा. स्त्रियांस कोणत्या प्रकारचें शिक्षण द्यावें, ह्या प्रश्नाच्या निकालावर तुह्मांस अवलंबून राहावयास नको. ह्याविषयीं तुमचीं मतें परस्परांपासून कितीही भिन्न असोत; पण ज्या प्रकारचें शिक्षण त्यांस देणें आवश्यक आहे, असें तुह्मांस वाटत

असेल, त्या प्रकारचें शिक्षण तुह्मी आपल्या बायकांस द्या. विद्येपासून मनुष्याचें हित होतें, अहित कधीं होत नाहीं, हें तुह्मांस आतां कळलें आहे. आणि त्याविषयीं तुह्मांस शंका नाहीं. तर, तुमच्या बायकांस थोडीबहुत विद्या आल्यानें त्या शाहाण्या होतील हें उघड आहे. ह्यास्तव, प्रपंचांतलें एक अत्यंत आवश्यक काम असें समजून तुह्मी आपल्या बायकांस निदान लिहिणें, वाचणें आणि थोडें हिशेब करणें शिकवा. त्यानें त्या शाहाण्या होऊन तुह्मांस प्रपंचांत चांगलें साह्य करतील. पहा, ह्या खानदेश जिल्ह्यांत लहानमोठे पांचशें शिक्षक आहेत, ह्यांच्या बायकांस—ह्मणजे पांचशें स्त्रियांस—असें खासगी रीतीनें शिकवून जर शाहाण्या केल्या, तर, पंचवीस पंचवीस मुलींच्या वीस शाळा वर्ष दोन वर्षेंपर्यंत तुह्मीं सर्वांनीं मिळून उत्तम रीतीनें फुकट चालविल्याचें पुण्य तुमच्या पदरीं पडणार आहे. आणि ह्यांत कांहीं वाईट नाहीं; सगळें चांगलें आहे. आणखी, शिक्षकांस जसें इतर लोकांपेक्षां अधिक ज्ञान असावें हें आवश्यक आहे, आणि विशेष भूषणावह आहे, तसें, त्यांच्या बायकांलाही विशेष शाहाणपण असणें आणि त्यांस इतर बायकांपेक्षां विशेष कळणें हें भूषणावह होणार आहे. तर, आपल्या स्वतःच्या कल्याणाकरितां, आणि आपल्या राष्ट्राच्या कल्याणाकरितां—किंबहुना आमच्या राष्ट्राचें जें अर्धें आंग अगदीं लंगडें पडलें आहे, त्यास बरें करून चलन देण्याकरितां—तुह्मीं हा एवढा आरंभ कृपा करून करावा. आणखी ही गोष्ट अगदीं सुसाध्य आहे. तुह्मांला अगदीं सहज करतां यावयासारखी आहे. हींत लोकापवादाचें भय काडीमात्रही नाहीं; स्वहित आहे, [illegible]त आहे, आणि पुण्य आहे. तर तुह्मी एकट्या खान[illegible] शिक्षकांनीं नव्हे, तर आमच्या देशांतल्या सगळ्या [illegible] शिक्षकांनीं एवढें काम मनःपूर्वक करावें, अशी प्रार्[illegible]

एवढें तुम्हीं कायावाचामनेंकरून केलें, म्हणजे तुम्हीं आपलें कर्तव्य पूर्णपणें केलें असें होईल; आणि त्याच्या योगानें आमच्या देशांतली विद्यार्थीमंडळी सन्मार्गास लागून तिच्या हातून आमच्या राष्ट्राचा उद्धार होईल. आणि त्याचें सगळें यश तुम्हांला मिळेल. ह्याहून मोठा लाभ कोणता व्हावा ?

हें तुमचें कर्तव्य करण्यास तुम्हांला परमेश्वर बुद्धि देवो, सामर्थ्य देवो, आणि शेवटीं त्यांत यश देवो, अशी त्याची प्रार्थना करून हें भाषण मी समाप्त करितों.

